डॉ.संतोष भ. नाईकवाडे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, सार्वजनिक आरोग्य विभाग, यांच्या प्रतिनियुक्तीबाबत.

**महाराष्ट्र शासन**
**उद्योग, ऊर्जा व कामगार विभाग**
**शासन आदेश क्र. औसुवआ-०५२३/प्र.क्र.८८/कामगार-१**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : ०६ जुलै, २०२३

**संदर्भ**:- १. सामान्य प्रशासन विभाग, शा.नि. क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/१२, दि. १७/१२/२०१६
२. डॉ.संतोष भ.नाईकवाडे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, प्रादेशिक मनोरुग्णालय येरवडा, जि.पुणे, यांचा दि.२१/०४/२०२३ रोजीचा अर्ज
३. सार्वजनिक आरोग्य विभागाचे पत्र क्र.प्रतिनि-२०२३/प्र.क्र.४१५/सेवा-३, दि.१६/०६/२०२३

**आदेश :**

डॉ.संतोष भ. नाईकवाडे, वैद्यकीय अधिकारी, गट-अ, सार्वजनिक आरोग्य विभाग यांची प्रमाणक शल्य चिकित्सक, गट-अ, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई या पदावर प्रतिनियुक्तीने ३ वर्षांसाठी खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून नियुक्ती करण्यात येत आहे.:-

अ) डॉ.संतोष भ. नाईकवाडे, वैद्यकीय अधिकारी ज्या तारखेला प्रतिनियुक्तीच्या पदावर रुजु होतील त्या तारखेपासून प्रतिनियुक्तीच्या सेवेचा प्रारंभ होईल आणि ती सेवा ज्या तारखेला ते आपल्या शासकीय मुळ पदाचा कार्यभार पुन्हा स्विकारतील त्या तारखेस समाप्त होईल.

ब) जर त्यांची सेवा लोकसेवेच्या हिताच्या दृष्टीने शासनाला आवश्यक वाटली तर प्रतिनियुक्तीचा कालावधी संपण्यापूर्वी कोणत्याही वेळी त्यांना परत बोलावून घेण्याचा अधिकार शासन/ सक्षम प्राधिकाऱ्यास म्हणजे सार्वजनिक आरोग्य विभागास राहील.

क) जर त्यांची सेवा स्वीयेतर नियोक्त्याला आवश्यक वाटली नाही तर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्याची मुभा शासनास म्हणजेच उद्योग, उर्जा व कामगार विभागास राहील. मात्र, याप्रमाणे परत पाठविण्यापूर्वी या विभागाने सार्वजनिक आरोग्य विभागास तीन महिन्यांची नोटीस दिली पाहिजे; आणि

ड) डॉ.नाईकवाडे यांनी मुळ विभागाकडे परत जाण्याचा आपला उद्देश आहे अशी कमीत कमी तीन महिन्यांची नोटीस उद्योग,उर्जा व कामगार विभागास दिल्यानंतर त्यांना मूळ विभागाकडे परत पाठविण्यात येईल.

इ) डॉ.नाईकवाडे यांना महाराष्ट्र नागरी सेवा (पदग्रहण अवधी, स्वीयेतर सेवा... इ.) नियम १९८१ मधील नियम ३९ व ४० (परिशिष्ट दोन) मधील तरतुदी व त्या नियमाखालील परिशिष्ट तीन मधील तरतुदी लागू राहतील. तसेच सामान्य प्रशासन विभाग, शा.नि.

क्र.एसआरव्ही-२०११/प्र.क्र.१३७/१२, दिनांक १७/१२/२०१६ यामधील तरतुदी देखील लागू राहतील.

ई) डॉ.नाईकवाडे यांच्या सेवाविषयक बाबी या त्यांच्या मूळ विभागामार्फत हाताळल्या जातील.

२. डॉ.संतोष भ. नाईकवाडे, वैद्यकीय अधिकारी यांच्या इतर सर्व प्रशासकीय बाबी सार्वजनिक आरोग्य विभाग व उद्योग, उर्जा व कामगार विभागामार्फत हाताळण्यात येतील. डॉ.नाईकवाडे यांना प्रतिनियुक्तीच्या पदावर हजर होण्यासाठी सार्वजनिक आरोग्य विभागाने तात्काळ कार्यमुक्त करावे.

३. सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असुन त्याचा संगणक संकेतांक २०२३०७०६१४३५१०२५१० असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

KARANSING PREMSING PATIL

Digitally signed by KARANSING PREMSING PATIL
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=INDUSTRIES ENERGY AND LABOUR DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6f2521c3a6d1f8429a3c2c9a42d575298ae82956908d63df441063695f377819, pseudonym=3A3CA4E4F15E12F04BF0F70BCA1F3C39DEE206CB, serialNumber=C7FEED7178D6C14666A5DF36811F1763590E65B6F836A87E63789DC234173D66, cn=KARANSING PREMSING PATIL
Date: 2023.07.06 14:37:54 +05'30'

**( क. प्रे. पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१. मा. मंत्री (कामगार ) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.मंत्री (सार्वजनिक आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. मा.प्रधान सचिव (कामगार) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
४. मा.प्रधान सचिव (सार्वजनिक आरोग्य विभाग) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, आरोग्य सेवा, मुंबई.
६. उप सचिव (सेवा-३), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
७. संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई
८. डॉ.संतोष भ. नाईकवाडे, वैद्यकीय अधिकारी, (मार्फत:- संचालक, औद्योगिक सुरक्षा व आरोग्य संचालनालय, मुंबई)
९. निवड नस्ती ( कामगार -१).